**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-**
**महाराष्ट्र अंतर्गत राज्यातील सर्व शाळांमध्ये संरक्षक**
**भिंतीची कामे घेणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग (रोहयो प्रभाग)**
**शासन निर्णय क्र. - मग्रारो-२०२३/प्र.क्र.१३७/रोहयो-०६अ**

१६ वा मजला, नवीन प्रशासन इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २५ जुलै, २०२३

**वाचा :-** शासन परिपत्रक नियोजन (रोहयो प्रभाग) विभाग क्र.मग्रारो-२०२०/प्र.क्र.७५/रोहयो-७,

दिनांक ०१, डिसेंबर, २०२०

**प्रस्तावना:** महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (मनरेगा) ही योजना राज्यात महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम, १९७७ अंतर्गत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना§महाराष्ट्र या नावाने मनरेगा योजनेच्या निकषांप्रमाणे राबविण्यात येत आहे. मनरेगा योजनेंतर्गत शाळेसाठी कंपाऊड हे काम अनुज्ञेय असल्याने सदर काम महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना- महाराष्ट्र अंतर्गत देखील अनुज्ञेय आहे. नियोजन (रोहयो प्रभाग) विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ०१/१२/२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या माध्यमातुन जिल्हा परिषद शाळांचा आणि अंगणवाड्यांचा भौतिक विकास करुन त्यांचा शैक्षणिक उपयोग करण्याबाबत सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन परिपत्रकान्वये जिल्हा परिषद शाळा आणि अंगणवाड्या यांच्या भौतिक विकासाकरीता पुढील १३ कामे मनरेगांतर्गत घेण्याबाबत निदेश देण्यात आले आहेत.

१) शाळेसाठी किचन शेड.
२) शाळा/ अंगणवाडीच्या इमारतीसाठी रेन वॉटर हारवेस्टींग संरचना.
३) शाळा /अंगणवाडीच्या परिसरात शोषखड्डा.
४) शाळा/ अंगणवाडीच्या परिसरात Multi Unit शौचालय.
५) शाळा/ अंगणवाडीसाठी खेळाचे मैदान.
**६) शाळा /अंगणवाडीसाठी संरक्षक भिंत (Wall Compound).**
७) वृक्षलागवड (बिहार पॅटर्न).
८) आवश्यकतेनुसार शाळा /अंगणवाडीसाठीच्या परिसरात पेव्हींग ब्लॉक.
९) शाळा /अंगणवाडीच्या परिसरात /बाहेर कॉंक्रीट नाली बांधकाम.
१०) शाळा /अंगणवाडीकडे येणारे रस्ते गुणवत्तापुर्ण करणे.
११) बोअरवेल पुनर्भरण (शाळा /अंगणवाडीत बोअरवेल असल्यास)
१२) गांडुळ खत प्रकल्प (यामध्ये तयार होणारे गांडुळ खत शाळा/अंगणवाडीच्या परिसरातील झाडासांठी वापरता येईल)
१३) नाडेप कंपोस्ट.

**राज्यातील सर्व शाळांभोवती महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी या योजनेमधुन शाळांच्या संरक्षक भिंतीचे काम हाती घेण्यासाठी सुचना निर्गमित करण्यात याव्यात असे निदेश** दिनांक १३/०६/२०२३ झालेल्या मा. राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत देण्यात आले आहेत. त्यानुसार मनरेगा योजनेंतर्गत राज्यातील सर्व शाळांभोवती संरक्षक भिंतीची कामे (Compound Walls) घेण्यासंदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत सुचना निर्गमित करण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :- उपरोक्त "वाचा" येथील दिनांक ०१ डिसेबर,२०२० रोजीच्या शासन परिपत्रकात अन्य कामांसोबत अनु.क्र.६) वर शाळा /अंगणवाडीसाठी संरक्षक भिंत (Wall Compound) या कामाचा यापुर्वीच समावेश करण्यात आला आहे. तथापि, सदर सुचना या केवळ जिल्हा परिषद शाळा /अंगणवाडी यांसाठीच देण्यात आल्या आहे. मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक १३/०६/२०२३ रोजीच्या बैठकीत मनरेगांतर्गत सर्व शाळांभोवती संरक्षक भिंती बांधण्याचे निदेश असल्याने यामध्ये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शाळा, इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या शाळा, आदीवासी विकास विभागाच्या शाळा, अल्पसंख्याक विकास विभागाच्या शाळा आणि सदर विभागांच्या अनुदानित/विनाअनुदानित शाळाचा देखील समावेश करण्यात येत आहे. तथापि, सदर शाळांच्या संरक्षक भिंतीचे काम करतांना जिल्हा परिषद शाळा आणि अंगणवाड्या यांच्या कामांना प्राधान्य देऊन तद्नंतर इतर शासकीय शाळा, शासनअनुदानित शाळा आणि विनाअनुदानित शाळा अशा क्रमाने शाळांसाठी संरक्षक भिंतीचे काम मनरेगांतर्गत घेण्यात येईल.

२. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत करण्यात येणाऱ्या कामांवरील मजुरी (अकुशल) आणि साहित्य (कुशल) यांवरील खर्चाचे प्रमाण जिल्हास्तरावर अनुक्रमे ६०:४० असे राखावयाचे केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयाने अधिसुचनेन्वये निदेश दिले आहेत. संरक्षक भिंतीच्या कामांवरील खर्च हा प्रामुख्याने साहित्यप्रधान खर्च असल्यामुळे सदर कामे मनरेगांतर्गत पुर्ण करतांना मर्यादा येतात. तथापि, मनरेगांतर्गत शाळांभोवती संरक्षक भिंतींची कामे करतांना मनरेगांतर्गतील अकुशल व कुशल खर्चावरील अनुक्रमे ६०:४० असे प्रमाण राखण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.

१) ज्या शाळा/ अंगणवाड्यांमधील परिसरात मनरेगांतर्गत मजुरीप्रधान कामे करणे शक्य आहे, अशा ठिकाणी मनरेगांतर्गत शाळेसाठी संरक्षक भिंत आणि अन्य मजुरीप्रधान अनुज्ञेय कामे (जसे वृक्षलागवड, मैदानाचे सपाटीकरण वा अन्य) घेऊन अकुशल व कुशल खर्चावरील अनुक्रमे ६०:४० असे एकुण प्रमाण राखण्यात यावे. या प्रकारे अकुशल व कुशल खर्चावरील प्रमाण राखुन कार्यवाही करतांना उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे मनरेगांतर्गत संरक्षक भिंतीचे काम करतांना शाळांचे प्राधान्यक्रम पाळण्याची आवश्यकता नाही.

२) वरीलप्रमाणे ज्या शाळा/ अंगणवाड्यांच्या परिसरात मनरेगांतर्गत मजुरीप्रधान कामे करणे शक्य नाही, अशा ठिकाणी शाळेतील पात्र विद्यार्थी/कर्मचारी यांचे शेतावर/पडीक जमीनीवर मनरेगांतर्गत फळबाग लागवड/ वृक्षलागवड वा तत्सम अन्य मजुरीप्रधान (अकुशल) कामे घेऊन मनरेगांतर्गत शाळेसाठी संरक्षक भिंत बांधण्यासाठी अकुशल व कुशल खर्चावरील अनुक्रमे ६०:४० असे प्रमाण राखण्यात यावे. या प्रकारे अकुशल व कुशल खर्चावरील प्रमाण राखुन कार्यवाही करतांना उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे मनरेगांतर्गत संरक्षक भिंतीचे काम करतांना शाळांचे प्रधान्यक्रम पाळण्याची आवश्यकता नाही.

३) ग्रामपंचायत पातळीवर मनरेगांतर्गत अनुज्ञेय विविध कामे आणि शाळेसाठी संरक्षक भिंतीचे काम यांच्या संयोजनातुन देखील शाळांसाठी संरक्षक भिंतीचे काम करता येईल.

४) ग्रामपंचायतीमध्ये मनरेगांतर्गतच्या कामांवरील प्रत्यक्ष खर्चानुसार उपलब्ध अतिरिक्त कुशल घटक वा संभाव्य अतिरिक्त कुशल घटक यांच्या मर्यादेत शाळेसाठी संरक्षक भिंतीचे काम करता येईल.

५) ग्रामपंचायत स्तरावर उपलब्ध विविध निधी जसे, वित्त आयोगाचा निधी, पेसांतर्गत उपलब्ध निधी, आमदार/खासदार यांचा विकास निधी, जिल्हा नियोजन समितीचा निधी, ग्रामपंचायतीचा स्वनिधी, सीएसआर व ज्या योजनेंतर्गत शाळेसाठी संरक्षक भिंत हे काम अनुज्ञेय अशा सर्व केंद्रीय/ राज्यस्तरीय/ जिल्हास्तरीय योजना यांच्या अभिसरणातुन पुरक कुशल खर्च (Part-C) उपलब्ध करुन देखील शाळेसाठी संरक्षक भिंत हे काम मनरेगांतर्गत

करता येईल. शाळेसाठी संरक्षक भिंत या कामांचा अकुशल घटकावरील खर्च (Part-A) आणि सदर खर्चाच्या प्रमाणात उपलब्ध कुशल घटकावरील खर्च (Part-B) मनरेगांतर्गत प्राप्त होईल.

३. जळगाव जिल्ह्यात मनरेगा योजनेंतर्गत शाळेसाठी संरक्षक भिंत या कामाचे अभिसरणातुन मोठ्या प्रमाणावर कामे घेण्यात आली आहेत. त्यानुसार जळगाव जिल्ह्यातील मनरेगा योजनेंतर्गत शाळेसाठी संरक्षक भिंत या कामाचे अंदाजपत्रक विचारात घेऊन नरेगा आयुक्त, नागपुर यांच्या कार्यालयामार्फत १०० मिटर इतक्या लांबीच्या कामाचे नमुना अंदाजपत्रक तयार करण्यात आले आहे. सदर नमुना अंदाजपत्रक आणि कामाचे डिझाईन परिशिष्ट “अ” म्हणुन सोबत जोडले आहे. मनरेगा योजनेसोबत अभिसरण, विविध कामांच्या संयोजनाव्दारे तसेच पुर्णपणे मनरेगांतर्गत अशा माध्यमातुन शाळेसाठी संरक्षक भिंतीच्या कामांचे वेगवेगळे डिझाईन तयार करुन आर्थिकदृष्ट्या किफायतशीर होईल असे नमूना अंदाजपत्रक नरेगा आयुक्त, नागपुर या कार्यालयामार्फत तयार करुन शासनस्तरावर, क्षेत्रीय कार्यालयांना आणि Mahaegs संकेतस्थळावर तातडीने उपलब्ध करुन द्यावेत.

४. शासन आदेशान्वये वेळोवेळी विहीत केलेल्या आदेशानुसार मनरेगांतर्गत शाळेसाठी संरक्षक भिंतीच्या कामांचे अंदाजपत्रक तयार करणे, तांत्रिक मान्यता देणे आणि प्रशासकीय मान्यता देणे याबाबतची कार्यवाही क्षेत्रीय स्तरावर करण्यात येईल.

५. मनरेगांतर्गत शाळेसाठी संरक्षक भिंतीचे काम करण्याबाबतचा प्रस्ताव तयार करुन सदर प्रस्ताव संबंधीत ग्रामपंचायतीकडे सादर करण्याची कार्यवाही संबंधीत शाळेच्या मुख्याध्यापकांमार्फत करण्यात येईल. संबंधित ग्रामपंचायतीच्या ग्रामसेवकांनी सदर प्रस्तावानुसारच्या कामांचा मनरेगा योजनेच्या वार्षीक पुरवणी कृती आराखड्यामध्ये तातडीने समावेश करुन घेण्याची कार्यवाही करावी. सदर कामे त्याच आर्थिक वर्षात सुरु होतील, याकरीता संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्याकडे संबधित मुख्याध्यापक/ ग्रामसेवक/ ग्रामरोजगार सेवक संयुक्तपणे पाठपुरावा करतील. तसेच, उपरोक्त प्रमाणे ग्रामपंचायतींमार्फत प्राप्त शाळेसाठी संरक्षक भिंतीच्या कामांच्या प्रस्तावांकरीता तातडीने तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता आणि कार्यारंभ आदेश देण्याची कार्यवाही संबधित कार्यक्रम अधिकारी आणि संबधित तांत्रिक अधिकारी यांच्यामार्फत करण्यात येईल.

६. मा. राज्य मंत्रिमंडळाच्या निदेशानुसार सदर शासननिर्णय निर्गमित करण्यात येत असल्याने विविध विभागांच्या सर्व संबंधित शासकीय अधिकारी/ कर्मचारी आणि नरेगा कक्षातील कर्मचारी यांनी सदर शासननिर्णयानुसार प्राथम्याने कार्यवाही करावयाची आहे.

७. सदर शासननिर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणक संकेतांक २०२३०७२६१६०६५२८३१६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJANA
PRADEEP KHOPDE

Digitally signed by SANJANA PRADEEP KHOPDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=162267a166279e51cd3f1cc6e10b61ce9868a859260375a1bba3e5f88931d998, pseudonym=2911D7031787EE13B33E937FE23AAB741D4241E4, serialNumber=5835A30DD240A2D86C82FB33FB5D7BCBF513D6EBBB4EFF8873D4E0AECC934DB5, cn=SANJANA PRADEEP KHOPDE
Date: 2023.07.26 16:09:54 +05'30'

**( संजना खोपडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई.

३. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. मा.मंत्री (रोहयो) यांचे खासगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
५. सर्व मा.मंत्री यांचे खासगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधान परिषद यांचे खासगी सचिव,विधानभवन,मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा यांचे खासगी सचिव,विधानभवन,मुंबई.
८. मा. समिती प्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ रोहयो समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सहसचिव,मंत्रालय,मुंबई.
१०. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग (माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता).
११. सर्व विभागीय आयुक्त.
१२. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर.
१३. सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक (मगांराग्रारोहयो).
१४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक (मगांराग्रारोहयो).
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरीता.)
१६. सर्व उपायुक्त (विकास).
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८. सर्व सहसचिव/उपसचिव /अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. सर्व तहसलिदार व गट विकास अधिकारी.
२०. निवडनस्ती–कार्यासन रोहयो-६अ.

शासन निर्णय, नियोजन विभाग, रोहयो प्रभाग, क्र. मग्रारो-2023/ प्र.क्र.137 /रोहयो-6अ
दिनांक 25 जुलै, 2023 सोबतचे परिशिष्ट 'अ'

# Type Estimate

**Type Estimate for Construction of Compound Wall 100 Mtr**

**Length = 100.00 Rmt.**

**Year - 2023-24**

**Amount of Rs. 10,91,394 /- Only.**

# ABSTRACT

**Name of work :-**

**Type Estimate for Construction of Compound Wall 100 Mtr**

| S.N. | Item of Work | Quantity | Rate | Unit | Amount | Labour Rate | Unskilled Amount | Skilled Amount |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 |
| 1 | Excavation in earth for all sorts of soil & silt, lime, shadu, sand/ grit, such types of strata including dressing and conveying the excavated material by head and upto a distance of 10m and laying or spreading or filling in furrahas in layers of 30cm thick upto lift of 1:50m as directed. (A) Excavation - (In General) Rate for the area EGS CSR Item No. 1A | 75.87 | 116.02 | Cum. | 8802.00 | 116.02 | 8802.00 | 0.00 |
| 2 | Providing soling using 80 mm size trap metal in 15 cm. layer including filling voids with Crushed sand/grit, ramming, watering etc. complete. PWD SSR 21.40 | 9.54 | 1308.60 | Cum. | 12484.00 | 392.40 | 3743.00 | 8741.00 |
| 3 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete in M-10 of trap/ granite/ quartzite/ gneiss metal for foundation and bedding including bailing out water, formwork, laying/pumping, compacting, roughening them if special finish is to be provided, finishing if required and curing complete, with fully automatic micro processor based PLC with SCADA enabled reversible Drum Type mixer/concrete Batch mix plant (Pan mixer) etc. complete. With natural sand/V.S.I. quality Artificial Sand PWD SSR Item No 24.01 | 6.21 | 5247.00 | Cum. | 32584.00 | 1454.40 | 9032.00 | 23552.00 |
| 4 | Providing and laying in situ/Ready Mix cement concrete M-20 of trap / granite /quartzite/ gneiss metal for R.C.C. work in foundations like raft, strip foundations, grillage and footings of R.C.C. columns and steel stanchions etc. including bailing out water, formwork, laying/pumping cover blocks, compaction and curing roughening the surface if special finish is to be provided (Excluding reinforcement and structural steel) etc. complete, with fully automatic micro processor based PLC with SCADA enabled reversible Drum Type mixer/ concrete Batch mix plant (Pan mixer) etc. complete. With natural sand/V.S.I. quality Artificial Sand PWD CSR Item No. 25.11 | 14.18 | 6393.60 | Cum. | 90687.00 | 1899.00 | 26935.00 | 63752.00 |
| 5 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M-20 of trap / granite /quartzite/ gneiss metal for R.C.C. columns as per detailed designs and drawing or as directed including centering, formwork, cover blocks, laying/pumping, compaction finishing the formed surfaces with cement mortar 1:3 of sufficient minimum thickness to give a smooth and even surface or roughening if special finish is to be provided and curing etc. complete,(Excluding reinforcement and structural steel).with fully automatic micro processor based PLC with SCADA enabled reversible Drum Type mixer/ concrete Batch mix plant (Pan mixer) etc. complete. With natural sand/V.S.I. quality Artificial Sand | 4.65 | 6302.78 | cum | 29283.00 | 1500.30 | 6970.00 | 22313.00 |
| 6 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M-20 of trap / granite /quartzite/ gneiss metal for R.C.C. beams and lintels as per detailed designs and drawings or as directed including centering, formwork, cover blocks, laying/pumping, compactionand roughening the surface if special finish is to be provided and curing etc. complete. (Excluding reinforcement and structural steel). with fully automatic micro processor based PLC with SCADA enabled reversible Drum Type mixer/ concrete Batch mix plant (Pan mixer) etc. complete. With natural sand/V.S.I. quality Artificial Sand PWD Item No 25.50 | 6.49 | 11042.10 | cum | 71619.00 | 4576.50 | 29683.00 | 41936.00 |
| 7 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M-15 of trap/ granite/quartzite/gneiss metal for coping to plinth or parapet, moulded or chamfered as per drawing or as directed including steel centering, plywood/ steel formwork compacting, roughening them if special finish is to be provided, finishing uneven and honeycombed surface and curing etc. complete. The Cement Mortar 1:3 plaster is considered for rendering uneven and honeycombed surface only. Newly laid concrete shall be covered by gunny bag, plastic, tarpaulin etc. (Wooden centering will not be allowed.) PWD SSR Item No 24.16 | 2.09 | 5723.10 | cum | 11952.00 | 1600.20 | 3342.00 | 8610.00 |
| 8 | Providing and fixing in position TMT - FE - 500 bar reinforcement of various diameters for R.C.C. pile caps, footings, foundations, slabs, beams columns, canopies, staircase, newels, chajjas, lintels pardis, copings, fins, arches etc. as per detailed designs, drawings and schedules. including cutting, bending, hooking the bars, binding with wires or tack welding and supporting as required complete. PWD Item No 26.33 | 1.92 | 80732.70 | Mt. | 154870.00 | 10585.80 | 20307.00 | 134563.00 |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 9 | Providing fly ash brick masonry with conventional/ I.S. type bricks in cement mortar 1:6 in superstructure including striking joints, raking out joints, watering and scaffolding etc. Complete PWD Item No. 27.13 | 41.77 | 6395.40 | Sqm. | 267123.00 | 1534.50 | 64093.00 | 203030.00 |
| 10 | Providing internal cement plaster 12mm thick in single coat in cement mortar 1:5 without neeru finish to concrete or brick surfaces, in all positions including scaffolding and curing etc. complete. PWD Item No 32.03 | 200.00 | 243.90 | Sqm. | 48780.00 | 183.60 | 36720.00 | 12060.00 |
| 11 | Providing and applying two coats of exterior weather shield paint of approved manufacture and of approved colour to the plastered surfaces including cleaning ,preparing the plaster surface ,applying primer coat ,scaffolding if necessary, and watering the surface for two days etc complete. NOTE: For Item No. 15 to 18 prior approval of Superintending Engineer will be necessary PWD Item | 400.00 | 265.50 | Sqm. | 106200.00 | 154.80 | 61920.00 | 44280.00 |
| 12 | Providing sand faced plaster externally in cement mortar using approved screened sand, in all positions including base coat of 15 mm thick in cement mortar 1:4 using waterproofing compound at 1 kg per cement bag curing the same for not less than 2 days and keeping the surface of the base coat rough to receive the sand faced treatment 6 to 8 mm thick in cement mortar 1:4 finishing the surface by taking out grains and curing for fourteen days scaffolding etc.complete. PWD Item No. 32.11 | 200.00 | 575.10 | Sqm. | 115020.00 | 370.80 | 74160.00 | 40860.00 |
| 13 | Providing and fixing mild steel grill gate with angle iron frame 65mm x 65mm x 10mm with iron bars at 150mm C/C and diagonal flats as per the detailed drawing including hinges, pivot block locking arrangement, welding riveting and oil painting of three coats of approved shade Weight of gate 35 Kg/Smt. PWD Item No. 44.10 | 3.78 | 2871.00 | Sqm. | 10852.00 | 452.70 | 1711.00 | 9141.00 |
| 14 | Providing and applying two coats of textured synthetic paint of approved shade and quality and one coat of primer before applying textured paint including scaffolding if necessary preparing surface by thoroughly cleaning oil, grease, dirt and other materials as required, etc. complete. PWD Item No 35.24 | 3.78 | 146.70 | Sqm. | 555.00 | 25.20 | 95.00 | 460.00 |
| 15 | Display Board | 1.00 | 5000.00 | No | 5000.00 | 0.00 | 0.00 | 5000.00 |
| | Total Amount | | | | 965811.00 | | 347513.00 | 618298.00 |
| 16 | **Material Quality Control Testing Charges** | | | | | | | |
| | **For Bricks** | 1.00 | 2175.00 | Test | 2175.00 | | | 2175.00 |
| | **For C.C. Cubes** | 4.00 | 690.00 | Test | 2760.00 | | | 2760.00 |
| | **Total Amount** | | | | 970746.00 | | | 623233.00 |
| 17 | **Add GST 18%** | | | | 112181.94 | | | 112181.94 |
| 18 | **Royalty Charges for Materials** | | | | | | | |
| | Metal | 15.38 | 216.18 | Cum | 3325.00 | | | 3325.00 |
| | Sand | 25.40 | 237.37 | Cum | 6029.00 | | | 6029.00 |
| 19 | Grand Total | | | | 1092281.94 | | 347513.00 | 744768.94 |

# MEASUREMENTS

**Name of work :-**

**Type Estimate for Construction of Compound Wall 100 Mtr**

| S.N. | Item of Work | No. | L | B | D | Quantity | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | |
| 1 | Excavation in earth for all sorts of soil & silt, lime, shadu, sand/ grit, such types of strata including | | | | | | |
| | For Column | 30 | 1.20 | 1.20 | 1.20 | 51.84 | |
| | Joint Column | 10 | 1.20 | 1.20 | 1.20 | 17.28 | |
| | Gate Column | 2 | 1.50 | 1.50 | 1.50 | 6.75 | |
| | | | | | **Total =** | **75.87** | Cum. |
| 2 | Providing soling using 80 mm size trap metal in 15 cm. layer including filling voids with Crushed | | | | | | |
| | For Column | 30 | 1.20 | 1.20 | 0.15 | 6.48 | |
| | Joint Column | 10 | 1.20 | 1.20 | 0.15 | 2.16 | |
| | Gate Column | 2 | 1.50 | 1.50 | 0.20 | 0.90 | |
| | | | | | **Total =** | **9.54** | Cum. |
| 3 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete in M-10 of trap/ granite/ quartzite/ gneiss | | | | | | |
| | Column | 30 | 1.20 | 1.20 | 0.10 | 4.32 | |
| | Joint Column | 10 | 1.20 | 1.20 | 0.10 | 1.44 | |
| | Gate Column | 2 | 1.50 | 1.50 | 0.10 | 0.45 | |
| | | | | | **Total =** | **6.21** | Cum |
| 4 | Providing and laying in situ/Ready Mix cement concrete M-20 of trap / granite /quartzite/ gneiss metal for R.C.C. work in foundations like raft, strip foundations, grillage and footings of R.C.C. columns and steel stanchions etc. including bailing out water, | | | | | | |
| | Column | 30 | 1.00 | 1.00 | 0.30 | 9.00 | |
| | Joint Column | 10 | 1.20 | 1.20 | 0.30 | 4.32 | |
| | Gate Column | 2 | 1.20 | 1.20 | 0.30 | 0.86 | |
| | | | | | **Total =** | **14.18** | Cum |
| 5 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M-20 of trap / granite /quartzite/ gneiss metal for R.C.C. columns as per detailed designs and drawing or as directed including centering, formwork, cover blocks, laying/pumping, compaction finishing the formed surfaces with cement mortar 1:3 of sufficient minimum thickness to | | | | | | |
| | Column | 30 | 0.23 | 0.23 | 2.00 | 3.17 | Cum |
| | | 10 | 0.23 | 0.23 | 2.00 | 1.06 | Cum |
| | Gate Column | 2 | 0.23 | 0.45 | 2.00 | 0.41 | Cum |
| | | | | | **Total =** | **4.65** | Cum |
| 6 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M-20 of trap / granite /quartzite/ gneiss metal for | | | | | | |
| | | 1 | 100.00 | 0.23 | 0.30 | 6.90 | |
| | For Gate | 2 | 2.00 | 0.23 | 0.45 | 0.41 | |
| | | | | | | **7.31** | |
| | Ded. | 40 | 0.23 | 0.30 | 0.30 | 0.83 | |
| | | | | | **Total =** | **6.49** | Cum |
| 7 | Providing and laying Cast in situ/Ready Mix cement concrete M-15 of trap/ granite/quartzite/gneiss metal for | | | | | | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | 1 | 100.00 | 0.23 | 0.10 | 2.30 | cum |
| | Ded. | 40 | 0.23 | 0.23 | 0.10 | 0.212 | |
| | | | | | Net qty | **2.09** | cum |
| 8 | Providing and fixing in position TMT - FE - 500 bar reinforcement of various diameters for R.C.C. pile | | | | | | |
| | Qty. I. No. 4+5+6+7 | | | | 27.404 | | |
| | | | | x | 70.00 | **1918.31** | |
| | | | | | Total = | **1918.31** | |
| | | | | | OR = | **1.92** | Mt |
| 9 | Providing fly ash brick masonry with conventional/ I.S. type bricks in cement mortar 1:6 in | | | | | | |
| | | 1 | 100.00 | 0.23 | 2.00 | 46.00 | |
| | Ded. | 40 | 0.23 | 0.23 | 2.00 | 4.232 | |
| | | | | | Net qty | **41.768** | sqm |
| 10 | Providing internal cement plaster 12mm thick in single coat in cement mortar 1:5 without neeru finish | | | | | | |
| | | 1 | 100.00 | 2.00 | | **200.000** | sqm |
| 11 | Providing and applying two coats of exterior weather shield paint of approved manufacture and of | | | | | | |
| | | 2 | 100.00 | 2.00 | | 400.00 | |
| | | | | | Total = | **400.00** | Rmt |
| 12 | Providing sand faced plaster externally in cement mortar using approved screened sand, in all | | | | | | |
| | | 1 | 100.00 | 2.00 | | **200.00** | Rmt |
| 13 | Providing and fixing mild steel grill gate with angle iron frame 65mm x 65mm x 10mm with iron bars at 150mm | | | | | | |
| | | 1 | 1.80 | 2.10 | | **3.78** | |
| | | | | | | **3.78** | sqmt |
| 14 | Providing and applying two coats of textured synthetic paint of approved shade and quality and | | | | | | |
| | | 1 | 1.80 | 2.10 | | **3.78** | |
| | | | | | | **3.78** | sqmt |
| 15 | Display Board | | | | | | |
| | | 1 | x | x | x | 1.00 | No |